महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास
रु.५५०.०० कोटी निधी वितरीत करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन निर्णय क्र.एसटीसी-०७२०/प्र.क्र.२८५/परि-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०५ ऑगस्ट, २०२०.

**प्रस्तावना -:**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाद्वारा राज्य शासनाने वेळोवळी दिलेल्या आदेशानुसार विविध प्रवासी वर्गाला प्रवासी भाडयात सवलती देण्यात येतात. सदर खर्चाची प्रतिपूर्ती दि.१.०४.२०१६ पासून गृह (परिवहन) विभागाद्वारे करण्याबाबत दि.२५/२/२०१६ च्या शासन निर्णयान्वये धोरणात्मक निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार प्रवास सवलत मूल्याची प्रतिपूर्ती शासनाकडून रोखीने तसेच काही रक्कम प्रवासी कराचे समायोजनाद्वारे महामंडळास करण्यात येत आहे.

कोविड-१९ आजाराच्या पार्श्वभूमीवर घोषित केलेल्या टाळेबंदीमुळे रा.प.महामंडळाची अत्यावश्यक वाहतूक सेवा वगळता बहुतांशी वाहतूक बंद आहे. त्यामुळे महामंडळाचे कर्मचाऱ्यांचे वेतन थकलेले आहे. अशा परिस्थितीत महामंडळास निधी वितरीत करण्याची बाब शासनास विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास कर्मचाऱ्यांचे प्रलंबीत वेतन व देणी यासाठी रु.५५०,००,००,०००/- (अक्षरी पाचशे पन्नास कोटी फक्त) एवढी रक्कम सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षाच्या तरतूदीमधून रोखीने प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे. महाराष्ट राज्य परिवहन महामंडळास यापुढे देय होणाऱ्या सवलतमूल्याच्या रक्कमेमधुन सदर रक्कम अग्रिम समजून वेळोवेळी समायोजित करण्यात येईल.

२. सदर खर्च सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा आणि सदर खर्च "मागणी क्रमांक बी-३, २०४१, वाहनांवरील कर ००, ००१, संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त, (दत्तमत्त) (अनिवार्य), (२०४१ ००१८) ३३, अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आंहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.०४/२०२०/सहसचिव (व्यव-८), दि. ०४.०८.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८०५१४०४१३६७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2020.08.05 15:13:11 +05'30'

**( द. ह. कदम )**

**अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
३. वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
४. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
५. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
८. वित्त विभाग (व्यय -८/साऊ/ अर्थसंकल्प-११/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९. गृह विभाग (बीयुडी-१/बीयुडी-२/परिवहन-३/परिवहन-४) मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती/परि १.